**घोड मोठा प्रकल्प, ता. शिरूर, जि. पुणे**
**प्रकल्पाचे फेरजल नियोजन**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण- ०३२४/प्र.क्र.१६३/२०२४/मोप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ मार्च, २०२५

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय P.W.D. No. MIP- ३८५४ दिनांक १२/०७/१९५४

२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम/०३/ (२३/२०२५)/प्र.बां-६/५४७/सन २०२५ दि.२९/०१/२०२५.

**प्रस्तावना :-**

घोड मोठा प्रकल्प महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत "ऊर्ध्व भीमा" या प्रदेशात आहे. या योजने अंतर्गत पुणे जिल्ह्यातील शिरूर तालुक्यातील मौजे चिंचणी येथे घोड नदीवर शिरूर तालुक्यातील मौजे चिंचणी व अहिल्यानगर जिल्ह्यातील मौजे वडगाव शिंदोडी या गावांच्या सरहद्दीवर मातीचे धरण बांधण्यात आले आहे. प्रकल्पाचे काम सन १९६५ मध्ये पुर्ण होवून प्रकल्पावर सिंचन सुरू आहे.

घोड प्रकल्पाच्या मूळ प्रकल्प अहवालानुसार प्रकल्पाची एकुण साठवण क्षमता २१६.३० द.ल.घ.मी (७.६३ अ.घ.फु.) असून प्रकल्पाचा उपयुक्त पाणीसाठा १५४.८० द.ल.घ.मी. (५.४६ अ.घ.फु.) एवढा आहे. मंजूर प्रकल्प अहवालानुसार प्रकल्पाचा सिंचनाचा पाणीवापर १० अ.घ.फु. एवढा आहे. कृष्णा पाणी तंटा लवादाचे अनुषंगाने केंद्रीय जल आयोगास सादर केलेल्यानुसार घोड प्रकल्पासाठीची वार्षिक पाणी वापराची तरतूद ही १०.४० अ. घ. फू. इतकी आहे.

महामंडळाने संदर्भिय पत्र क्र.२ अन्वये सादर केल्याप्रमाणे अहिल्यानगर जिल्ह्यातील श्रीगोंदा व अहिल्यानगर तालुक्यातील ३२ गावातील ल.पा तलाव, को.प. बंधारे, साठवण बंधारे भरून सिंचनासाठी व पिण्यासाठी पाणी उपलब्ध करुन देण्याबाबत शेतकरी व स्थानिक लोकप्रतिनिधी यांची मागणी आहे. त्यामुळे वरील मागणीनुसार सदर क्षेत्रासाठी घोड प्रकल्पांतर्गत धरणाच्या उत्तर-पूर्व दिशेला असणाऱ्या अवर्षण ग्रस्त प्रदेशातील सिंचनासाठी व पिण्यासाठी साकळाई उपसा सिंचन योजना प्रस्तावित आहे.

घोड प्रकल्पाचा सन २००९-२०२१ या कालावधीतील घोड प्रकल्पाचा वार्षिक महत्तम पाणीवापर ७.९८ अ.घ.फु. इतका असुन नियोजित वार्षिक पाणीवापरापेक्षा (१०.४०-७.९८) २.४२ अ.घ.फु. ने कमी आहे. साकळाई उपसा सिंचन योजनेअंतर्गत १२००० हेक्टर क्षेत्रास सिंचनासाठी १.६ अ.घ.फु. पाणी व पिण्यासाठी ०.२ अ.घ.फु. पाणी अशाप्रकारे एकूण १.८ अ.घ.फु. पाणी घोड धरणातून प्रस्तावित करण्यात आले आहे. अशाप्रकारे घोड प्रकल्पाचा आजअखेर महत्तम वार्षिक पाणीवापर व प्रस्तावित साकळाई उपसा सिंचन योजनेसाठी आवश्यक पाण्याची गरज लक्षात घेता

सदर पाणी घोड प्रकल्पाचे अस्तित्वातील वार्षिक पाणीवापराच्या तरतुदीतून भागवणे शक्य असल्याचे महामंडळाने सादर केले आहे. तथापि प्रस्तावित साकळाई उपसा सिंचन योजनेच्या पाण्याची तरतूद घोड प्रकल्पाचे अस्तित्वातील पाणी नियोजनात नसलेने घोड प्रकल्पाचे फेर जलनियोजन मंजूर करणे विचाराधीन होते. घोड मोठा प्रकल्प, ता. शिरूर, जि. पुणे प्रकल्पाचे पाणी वापराचे फेरनियोजनाबाबत खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त नमूद बदलानुसार कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी सादर केलेल्या पाणी वापराच्या फेर जलनियोजनास “परिशिष्ट-अ” नुसार खालील शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) घोड प्रकल्पाचे मुळ लाभधारक सिंचनापासून वंचित राहणार नाही, याची संपुर्ण जवाबदारी महामंडळाची राहील.

२) प्रकल्पाचा पाणीवापर कृष्णा पाणी तंटा लवादाने अनुज्ञेय केल्याप्रमाणे कृष्णा खोऱ्याचे जलनियोजनाच्या मर्यादेत राहील, याची दक्षता घेण्यात यावी.

३) शासन निर्णय दि.२३/११/२०१६ अन्वये साकळाई उपसा सिंचन योजनेस सक्षम स्तरावर मान्यता झाल्याशिवाय कोणतेही निविदेबाबत कार्यवाही करण्यात येवू नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२११४१८१९३५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

CHIRAG HONAJI DHUM

Digitally signed by CHIRAG HONAJI DHUM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=23f6b4a24a72ac05f32b626e40125fbbb50c34cce58e95aed204b2e241b2523a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B46097718CCA9C42B3DE3627870D8AC9FF3EBB3097757099D7A23306259F7023, cn=CHIRAG HONAJI DHUM
Date: 2025.03.21 14:19:51 +05'30'

**(चिराग धूम)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र- परिशिष्ट - अ**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे स्वीय सहाय्यक.
३. मा. मंत्री, स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, स्वीय सहाय्यक , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विधानसभा/विधान परिषद सदस्य सर्व.
६. स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. स्वीय सहाय्यक, सचिव(प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

## <u>घोड प्रकल्पाचे पाणी वापराचे फेरनियोजन</u>

शासन निर्णय क्र.संकीर्ण- ०३२४/प्र.क्र.१६३/२०२४/मोप्र-१

**दिनांक- २१/०३/२०२५**

**" परिशिष्ट - अ "**

| **अ.क्र.** | **घोड प्रकल्पाचा मंजूर प्रकल्प अहवालानुसार पाणीवापर (अ.घ.फु.)** | | **महाराष्ट्र शासन पत्र दि.२०/१०/२००१ नुसार कृष्णा पाणी तंटा लवादास कळविलेला कलम VII नुसारचा घोड प्रकल्पाचा पाणीवापर (अ.घ.फु.)** | | **महाराष्ट्र शासन पत्र दि.२०/१०/२००१ नुसार कृष्णा पाणी तंटा लवादास कळविलेला कलम VII नुसारचा घोड प्रकल्पात साकळाई उ.सिं.यो. अंतर्भुत करून प्रस्तावित पाणीवापर (अ.घ.फु.)** | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सिंचनासाठी पाणी वापर | १०.०० | सिंचनासाठी पाणी वापर | ९.७८ | **सिंचनासाठी पाणी वापर** | |
| | | | | | १) घोड प्रकल्प | ७.९८ |
| | | | | | २)साकळाई उ.सिं.यो. | १.६० |
| २ | पिण्यासाठी पाणीवापर | ....... | पिण्यासाठी पाणीवापर | ०.०६ | **पिण्यासाठी पाणीवापर** | |
| | | | | | १)घोड प्रकल्प | ०.०६ |
| | | | | | २)साकळाई उ.सिं.यो. | ०.०४ |
| ३ | औद्योगिक पाणीवापर | ....... | औद्योगिक पाणीवापर | ०.००८ | **औद्योगिक पाणीवापर** | |
| | | | | | १)घोड प्रकल्प | ०.००८ |
| | | | | | २)साकळाई उ.सिं.यो. | ०.०० |
| | **एकुण प्रकल्प पाणीवापर** | **१०.००** | **एकुण प्रकल्प पाणीवापर** | **९.८४८** | **एकुण प्रकल्प पाणीवापर** | **९.६८८** |

CHIRAG HONAJI DHUM

Digitally signed by CHIRAG HONAJI DHUM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=23f6b4a24a72ac05f32b626e40125fbbb50c34cce58e95aed204b2e241b2523a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B46097718CCA9C42B3DE3627870D8AC9FF3EBB3097757099D7A23306259F7023, cn=CHIRAG HONAJI DHUM
Date: 2025.03.21 14:20:18 +05'30'

**(चिराग धूम)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**